कांदळवन (Mangrove) क्षेत्राच्या संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापनांतर्गत ३७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२१/प्र.क्र.२५१/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १३ सप्टेंबर, २०२१.

**पहा :-**

१) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१०/प्र.क्र.९२/फ-१, दि. १.११.२०११
२) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.४८/२०-२१/१५१; दिनांक ८.०२.२०२१.
४) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १५.०२.२०२१.
५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १६.०३.२०२१
६) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १०.०८.२०२१

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्रातील ७२० कि.मी. तटीय क्षेत्रातील कांदळवनाचे संरक्षण, संवर्धन व व्यवस्थापन करण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये एकूण ३७ अस्थायी पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर ३७ अस्थायी पदांना दिनांक २८.२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये विनंती केली आहे.

**२.** उपरोक्त प्रस्तावानुषंगाने तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन, सदर ३७ अस्थायी पदांना या विभागाच्या समक्रमांक दिनांक १६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०२१ ते दिनांक ३१.०८.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

**३.** वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. यास्तव खालील विवरणपत्र अ मध्ये दर्शविलेल्या ३७ अस्थायी पदे **दिनांक १.०९.२०२१ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

**विवरणपत्र - अ**

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहा. वनसंरक्षक | १ |
| २ | वनक्षेत्रपाल | ४ |
| ३ | वनक्षेत्र सर्वेक्षक | १ |
| ४ | सर्वेक्षक | २ |

| | | |
|---|---|---|
| ५ | वनरक्षक | १२ |
| ६ | लघुलेखक (कनिष्ठ श्रेणी) | १ |
| ७ | मुख्य लेखापाल | १ |
| ८ | लेखापाल | ४ |
| ९ | लिपिक | ५ |
| १० | नौकाचालक | २ |
| ११ | डिंघी चालक | २ |
| १२ | खलाशी | २ |
| एकूण | | ३७ |

अ) सदर ३७ अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर ३७ अस्थायी पदे भूमी अभिलेख कार्यालयातील असून ती वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या आकृतीबंधातील पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी मँग्रोव्ह व्यवस्थापन, संरक्षण व संवर्धनासाठी निर्माण करण्यात आलेले पद जेव्हा (Out Sourcing) बाह्य स्त्रोताद्वारे भरले जातील तेव्हा सदर आस्थापनेवरील येणारा मानधनावरील खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (२४०६ ७२२३), १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३२) १३ केंद्रीय वित्त आयोगाच्या शिफारशींनुसार वनांचे व्यवस्थापन याकरिता केंद्र सहाय्य (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र ज्यावेळी सदर पदे नियमित अधिकारी / कर्मचाऱ्यांमार्फत भरली जातील त्या वेळी त्यांचे वेतन व भत्ते मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १०१ वनसंरक्षण व विकास (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) या लेखाशिर्षा खाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१३१३०३१७७९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.09.13 13:04:26 +05'30'

**( अरविंद आपटे )**
मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
६) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
८) सर्व संबंधित उप वनसंरक्षक.
९) फ-४ / फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.